**सिंचन क्षमता निर्मितीस गती देण्यासाठी विविध शासन निर्णय, परिपत्रक व आदेशांचा आढावा घेण्यासाठी अभ्यासगट स्थापनेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्र. समिती -०४१७/(प्र.क्र.२०९/१७)/मो.प्र.१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना :**

जलसंपदा विभागांतर्गत मागील काही वर्षांमध्ये क्षेत्रिय कामाबाबत विविध शासन निर्णय, परिपत्रक निर्गमित करुन कार्यपध्दती निश्चित करण्यात येत आहे. जसे की, निविदेतील कलम ३७/३८ चा वापर व त्यावरील बंधने, त्याचप्रमाणे भुसंपादन झाल्याशिवाय क्षेत्रिय कामे सुरू करु नयेत तसेच कोणत्याही प्रकारच्या निविदा काढून दायित्व निर्माण करु नये अशा अनेकविध सूचना त्यावेळच्या प्राप्त परिस्थितीत देण्यात आलेल्या होत्या. सदरहू शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या सूचनांमुळे क्षेत्रिय स्तरावर प्रकल्पाची कामे विहीत मुदतीत पूर्ण करण्यासाठी व पर्यायाने निर्धारीत सिंचन निर्मितीचे व लाभार्थींना सिंचनाचा लाभ देण्याचे उद्दिष्ट विलंबाने साध्य होत असल्याचे निदर्शनास येत आहे. यातील काही प्रकल्प केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेमध्ये समाविष्ट आहेत. या सर्व कार्यपध्दतीमुळे/ निर्बंधामुळे केंद्र शासनाची आर्थिक मदत मिळूनही सदर निधी खर्च करण्यास अडचणी येत असून त्यामुळे केंद्र शासनाद्वारे महाराष्ट्र राज्याच्या जलसंपदा विभागाच्या कामातील प्रगतीबाबत नाराजी व्यक्त केली जाते. त्याचप्रमाणे या सर्व बाबींचा अनुशेष जिल्हयातील प्रकल्पांच्या कामांवरही विपरीत परिणाम होत आहे. या सर्व अडचणी क्षेत्रिय अधिका-यांनी वेळोवेळी मा. मंत्री महोदय व प्रधान सचिव यांच्याकडे झालेल्या प्रकल्प आढावा बैठकीत प्रकर्षाने मांडण्यात आलेल्या आहेत.

त्यामुळे शासनामार्फत निर्गमित करण्यात आलेल्या विविध शासन निर्णयांच्या कामाच्या प्रगतीवर प्रतीकुल परिणाम करणा-या तरतुदी यांचा अभ्यास करुन त्यात आवश्यक ते बदल करण्याच्या अनुषंगाने अभ्यासगट स्थापन करण्याकरीता मा. मंत्री(जलसंपदा) यांचे कार्यालयातून निदेश प्राप्त झाले आहेत. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे .

**<u>शासन निर्णय :-</u>**

१.०० जलसंपदा विभागांतर्गत निर्गमित करण्यात आलेले विविध शासन निर्णय, आदेश, परिपत्रकाव्दारे दिलेल्या सूचनांचा सर्वकष आढावा घेऊन व शासनाच्या प्रचलीत धोरणास अनुसरुन सिंचनक्षमता निर्मिती कामांची गती वाढवून ती निश्चित कालावधीत पूर्ण करणेसाठी ठोस शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे अभ्यासगट करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | कार्यालयाचे नांव | पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. अविनाश सुर्वे | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | अध्यक्ष |
| २ | श्री रा. ब.घोटे | कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे | सदस्य |
| ३ | श्री. हं. आ. ढंगारे | कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद | सदस्य |
| ४ | श्री. खलिल अन्सारी | प्रभारी कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे | सदस्य |
| ५ | श्री.सं.दे.कुलकर्णी | मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, पुणे | सदस्य |
| ६ | श्री.ता.ना.मुंढे | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे | सदस्य |
| ७ | श्री.वि.गि.राजपूत | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव | सदस्य |
| ८ | श्री. विजय घोगरे | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा | सदस्य सचिव |

२.०० समितीची कार्यकक्षा :

शासन स्तरावरुन निर्गमित झालेल्या विविध शासन निर्णयांचा अभ्यास करणे आणि त्या शासन निर्णयांन्वये देण्यात आलेल्या सूचनांमुळे जर क्षेत्रिय स्तरावर सिंचन क्षमता निर्मितीच्या कामांच्या गतीवर परिणाम होत असेल तर अशा शासन निर्णयांमध्ये सुधारणा करण्याबद्दल शासनास शिफारशी करणे.

३.०० अभ्यासगटास आवश्यकता असल्यास अहवाल तयार करणेकामी शासनाच्या सेवेतून निवृत्त झालेल्या दोन अनुभवी अधिका-यांना विशेष निमंत्रित करुन त्यांच्याही सूचनांचा अंतर्भाव करता येईल. तरी उपरोक्त अभ्यासगटाने प्रस्तावनेत नमूद केलेल्या मुद्यांचा सर्वकष आढावा घेऊन आपला अहवाल दोन महिन्यांत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०४१७१२११०५७८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Tirmanwar Santosh
Ramkishan

Digitally signed by Tirmanwar Santosh Ramkishan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf0117ad341668a72bc3fcc8a83a2fab1d9b23e2ae276141178afc4dc8b5d790, serialNumber=37b5be33c57130083d7c9245fb12e91e0019861744c920676df5a5236c14b3a2, cn=Tirmanwar Santosh Ramkishan
Date: 2017.04.17 12:12:42 +05'30'

**(सं. रा. तिरमनवार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. स्विय सहायक, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय मुंबई.
३. स्विय सहायक, अपर मुख्य सचिव नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
४. स्विय सहायक, अपर मुख्य सचिव कृषी व पणन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. स्विय सहायक, अपर मुख्य सचिव वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. स्विय सहायक, अपर मुख्य सचिव महसूल विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. स्विय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि) विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. स्विय सहायक, प्रधान सचिव (वने) विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. स्विय सहायक, प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०.स्विय सहायक, प्रधान सचिव ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
११.स्विय सहायक, सचिव जलसंधारण विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२.स्विय सहायक, सचिव (मदत व पुनर्वसन) विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१३.महासंचालक महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था नाशिक.
१४.कार्यकारी संचालक कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे.
१५.कार्यकारी संचालक गोदावरी व मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ औरंगाबाद.
१६.कार्यकारी संचालक कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ पूणे.
१७.कार्यकारी संचालक विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ नागपूर.
१८.कार्यकारी संचालक तापी पाटबंधारे विकास महामंडळ जळगांव.
१९.स्विय सहायक, मुख्य अभियंता व सहसचिव जलसंपदा विभाग मंत्रालय मुंबई.
२०.स्विय सहायक सर्व उपसचिव जलसंपदा विभाग मंत्रालय मुंबई.
२१. सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई.
२२. सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी ),जलसंपदा विभाग.
२३ .सर्व कार्यकारी अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी ),जलसंपदा विभाग.
प्रत:- मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.